कॅप्टिव्ह मार्केट योजना- सन २०२३-२४ करीता
निधी वितरीत करण्याबाबत

महाराष्ट्र शासन

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्र:- पुरक २०२३/प्र.क्र.४८/टेक्स-२**

१६ वा मजला, नवीन प्रशासन भवन,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक -: ०६ मार्च, २०२४

**वाचा :** १) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.धोरण २०२३/प्र.क्र.८१/टेक्स-५, दि.०२ जून, २०२३

२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, धोरण २०२३/प्र.क्र. १०६/टेक्स-५ दि.०३ नोव्हेंबर, २०२३.

३) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग सपववि-३७०१२/९८/२०२३-DESKTEX-२ दि.१० नोव्हेंबर, २०२३

**प्रस्तावना**-:

राज्याच्या एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण २०२३-२८ दि.०२ जून, २०२३ मधील परिच्छेद क्र.११(३) नुसार अंत्योदय शिधापत्रिका धारक कुटुंबाना वस्त्रोद्योग विभागामार्फत यंत्रमागावर विणलेली प्रति कुटुंब प्रतिवर्षी एक साडी भेट देण्याची कॅप्टिव्ह मार्केट योजना संदर्भ ३ नुसार राज्यात सुरु करण्यात आली आहे. सदर योजनेसाठी महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळ मर्या. नवी मुंबई यांना नोडल संस्था नेमण्यात आले आहे. साड्यांचे वितरण राज्य शासनाच्या सार्वजनिक वितरण प्रणाली अंतर्गत करण्यात येणार असून लाभार्थ्यांना रास्त भाव दुकानांमधून साडी वितरीत करण्यात येणार आहे. सदर योजनेकरीता साड्यांचे उत्पादन, वाहतूक, जाहिरात, प्रसिध्दी, साठवणूक, हमाली यासाठी येणारा खर्च महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळाला राज्य शासनाकडून देण्यात येणार आहे. तद्नंतर संबंधीतांना देयके अदा करण्याची जबाबदारी महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळाची असेल.

सदर योजनेकरीता सन २०२३-२४ च्या हिवाळी अधिवेशनात रु.१२५.०० कोटी एवढ्या रक्कमेचा पुरवणी मागणीचा प्रस्ताव वित्त विभागास सादर केला होता. मागणी क्र.व्ही-२, २८५१,ग्रामोद्योग व लघुद्योग,(००)११०,संमिश्र ग्रामोद्योग व लघुद्योग आणि सहकारी संस्था,(०३) एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण २०२३-२८, (०३) (०१) एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण २०२३-२८ अंतर्गत कॅप्टिव्ह मार्केट योजना (कार्यक्रम),३३, अर्थसहाय्य (२८५१ ७४४५) अंतर्गत रु.१२५.०० कोटी इतका निधी पुरवणी मागणीद्वारे मंजूर करण्यात आलेला आहे. त्याअनुषंगाने सदर योजनेकरीता सन २०२३-२४ च्या हिवाळी अधिवेशनात मंजूर झालेल्या पुरवणी मागणीपैकी या योजनेकरीता आवश्यक असलेल्या रु.९५.९४ कोटी एवढ्या रक्कमेचा निधी वितरणाचा प्रस्ताव वित्त विभागास सादर केला होता. त्यानुसार सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता पुरवणी मागणीद्वारे प्राप्त झालेल्या रु. १२५.०० कोटी तरतुदीपैकी रु. ८७.५० कोटी वितरीत करण्यास वित्त विभागाने मान्यता दिलेली आहे. त्यास अनुसरुन सदर योजनेकरीता साड्यांचे उत्पादन, वाहतूक, जाहिरात, प्रसिध्दी, साठवणूक, हमाली व इतर खर्च यासाठी

येणारा खर्च महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळाला वितरीत करावयाचा असल्यामुळे महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळास रु. ८७.५० कोटी इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अंत्योदय शिधापत्रिका धारक कुटुंबाना वस्त्रोद्योग विभागामार्फत यंत्रमागावर विणलेली प्रति कुटुंब प्रतिवर्षी एक साडी भेट देण्याच्या कॅप्टीव्ह मार्केट योजनेकरीता साड्यांचे उत्पादन, वाहतूक, जाहिरात, प्रसिध्दी, साठवणूक, हमाली व इतर खर्च यासाठी येणारा खर्च संबंधीतांना वितरीत करण्यासाठी सदर योजनेची नोडल संस्था असलेल्या महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळाला रु.८७.५० कोटी इतका निधी वितरीत करण्यास या आदेशान्वये शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजनेची अंमलबजावणी ही संदर्भ ३ मधील शासन निर्णयातील कार्यपद्धतीनुसार करावी.

३. शासनाने विहित केलेल्या निकषाप्रमाणे उत्पादन केलेल्या साड्या व्यवस्थितरित्या सार्वजनिक वितरण व्यवस्था (PDS) यंत्रणेच्या तालुका स्तरावरील गोदामापर्यंत पोच झाल्याची महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळाने खात्री केल्यानंतरच संबंधीतांना देयके अदा करण्यात यावीत.

४. महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळाने संबंधीतांची देयके अदा केल्यानंतर त्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र देयकांच्या प्रतीसह शासनास सादर करावे. संबंधीतांची देयके अदा केल्यानंतर शिल्लक निधी महामंडळाने शासन खाती जमा करावा.

५. महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळाने सर्व साड्यांचे वितरण झाल्यानंतर शासनास सविस्तर अहवाल सादर करावा.

६. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ मधील परिच्छेद क्र. ३ च्या अनुषंगाने परिशिष्टातील अ.क्र. १,२,३,४,५,६,७, व ८ या प्रकरणी लागू नाहीत. महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळाला मंजूर करण्यात येणारे शासकीय भाग भांडवल हे परिशिष्टातील अ.क्र.९ येथील अनुक्रमे “३३-अर्थसहाय्य” या बाबीखाली मंजूर करण्यात येते. परिशिष्टातील अ.क्र.९ येथील तपासणी सुचीमधील याप्रकरणी लागु असलेल्या मुद्द्यांची पुर्तता होत असुन त्याबाबतची माहिती खालीलप्रमाणे आहे:-

| अ .क्र. | मुद्दा | विभागाचे अभिप्राय |
|---|---|---|
| १ | योजनेस प्रशासकीय मान्यता. | होय. सदर योजनेस शासन निर्णय दिनांक १०.११.२०२३ अन्वये प्रशासकीय मान्यता आहे. |
| २ | निधी वितरण, शासन निर्णयातील अटी व शर्तींची पूर्तता झाल्यानंतरच होणार आहे. | होय. |
| ३ | यापूर्वी वितरीत केलेल्या ७५% निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र. | लागू नाही |

| | | |
|---|---|---|
| ४ | यापूर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने लेखापरीक्षक / महालेखापाल यांच्याकडून कोणतेही गंभीर आक्षेप नाहीत. | लागू नाही |
| ५ | यापूर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने लेखापरीक्षक / महालेखापाल यांच्याकडून कोणतेही गंभीर आक्षेप नाहीत. | लागू नाही |
| ६ | वस्तू खरेदी करण्यापूर्वी खरेदी केलेल्या अशा वस्तुंची नोंद Dead Stock रजिस्टरमध्ये घेण्यात आली असून त्याचा योग्य वापर झाला असून त्या पडून नाहीत, याचे प्रमाणपत्र. | याबाबतची पुर्तता करुन घेण्याची जबाबदारी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळ मर्या, मुंबई यांची राहील. |
| ७ | यामधून खरेदी होणार असल्यास प्रत्यक्ष वस्तू प्राप्त झाल्यानंतरच संबंधितांना देयक अदा केले जाणार आहे. | याबाबतची पुर्तता करुन घेण्याची जबाबदारी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळ मर्या, मुंबई यांची राहील. |
| ८ | आवश्यक त्या ठिकाणी नियोजन विभाग, आदिवासी / सामाजिक न्याय विभाग यांची निधी वितरणास सहमती आहे. | लागू नाही. |
| ९ | प्रस्तुत योजनेत कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. | या योजनेखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. |
| १० | निधी स्वीय प्रपंची लेखा अथवा बँक खात्यात जमा न करता खर्च केला जाणार आहे. | होय |

७. या वरील खर्च खालील नमुद लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व चालु आर्थिक वर्षी (सन २०२३-२४) करीता मंजुर झालेल्या तरतुदीतुन भागविण्यात यावा :-

मागणी क्र.व्ही-२,
२८५१,ग्रामोद्योग व लघुद्योग,
(००)११०,संमिश्र ग्रामोद्योग व लघुद्योग आणि सहकारी संस्था,
(०३) एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण २०२३-२८,
(०३) (०१) एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण २०२३-२८ अंतर्गत कॅप्टिव्ह मार्केट योजना (कार्यक्रम),
३३, अर्थसहाय्य (२८५१ ७४४५)

८. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या रक्कमेचे आहरण करून महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळ मर्या, मुंबई यांना वितरीत करण्याकरिता श्री. सु.पु.पांगारकर, कार्यासन अधिकारी (रोखशाखा) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून व श्री. श्रीकृष्ण पवार, उप सचिव (वस्त्रोद्योग) सहकार,

पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय मुंबई -३२ (V०००८) यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेली रक्कम अधिदान व लेखाधिकारी कार्यालय मुंबई, येथून आहरीत करून महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळ मर्यादित, मुंबई (MAHARASHTRA STATE POWERLOOMS CORPORATION LTD. MUMBAI) यांच्या CANARA BANK, Nerul West, Navi Mumbai - ४०० ७०६. A/c no- ५०३५३०५००००३३, IFSC Code- CNRB००१५४९६, MICR CODE - ४०००१५२४८ या बँक खात्यावर RTGS द्वारे वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

९. सदर शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक क्रमांक क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३ दि. १२ एप्रिल २०२३ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकार अन्वये व वित्त विभाग अनौसं क्र.४२/२०२४/व्यय-२ दि.२३.०१.२०२४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यांत आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०३०६१२२०५१२५०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

GAURI RAHUL MHASKE

Digitally signed by GAURI RAHUL MHASKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=CO-OPERATION MARKETING AND TEXTILES DEPARTMENT, 2.5.4.20=9e5721a987027f2e238034188d086bb44a9aa24eeb5b83735e1bbb433b57d4ef, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B018BA858DD6B20CC7A84F6BC86A86D6A6E9AC3AC56C5DBFCD89F36C74DE3E1F, cn=GAURI RAHUL MHASKE
Date: 2024.03.06 12:31:23 +05'30'

**( गौरी रा. म्हस्के )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा .उपमुख्यमंत्री तथा मंत्री (गृह, विधी व न्याय) महाराष्ट्र राज्य याचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. उपमुख्यमंत्री तथा मंत्री (वित्त) महाराष्ट्र राज्य याचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. सर्व मंत्री (सर्व), महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन,मुंबई.
७) मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन,मुंबई.
८) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
९) अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई.
१०) अपर मुख्य सचिव (नियोजन), मंत्रालय, मुंबई.
११) सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन ववस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) सचिव (अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग), मंत्रालय, मुंबई.
१३) आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर.
१४) संचालक (रेशीम), रेशीम संचालनालय, नागपूर.
१५) उपसचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन ववस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळ, नवी मुंबई

१७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.

१८) महालेखापाल (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर.

१९) महालेखापाल (वाणिज्यिक लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर.

२०) कक्ष अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई

२१) वित्त विभाग, कार्यासन (व्यय-२), मंत्रालय, मुंबई.

२२) नियोजन विभाग, कार्यासन (१४३१) मंत्रालय, मुंबई.

२३) अवर सचिव (१७-स) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.

२४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

२५) निवासी लेखा परीक्षक, मुंबई.

२६) सहसंचालक, लेखा व कोषागारे (संगणक कक्ष), नवीन प्रशासन भवन, मुंबई.

२७) निवड नस्ती (टेक्स-२)